**आस्थापना - कोकण विभाग**

**कोकण भवन प्रशासकीय इमारतीच्या साफसफाईसाठी मंजूर असलेल्या १८ अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०१७ ते ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१७/प्र.क्र.३२/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १५ एप्रिल, २०१७.

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि. २० मार्च, २००६
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र. ७९/ई-८, दि. १८ ऑक्टोबर, २०१६.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०/०२/२०१७.
४) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. मशा/ आस्था/कार्या-४/इनजी/मु.वा.प्र./इ. शाखा/२०१७, दि.१८/०३/२०१७.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. १ येथील दि.२० मार्च, २००६ च्या शासन निर्णयानुसार क्षेत्रिय कार्यालयातील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील दि.१८/१०/२०१६ च्या शासन निर्णयान्वये कोकण भवन प्रशासकीय इमारतीच्या साफसफाईसाठी मंजूर असलेल्या आकृतीबंधाबाहेरील १८ अस्थायी पदांना दि.०१/१०/२०१६ ते दि.२८/०२/२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील दि.१०/०२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन कोकण भवन प्रशासकीय इमारतीच्या साफसफाईसाठी मंजूर असलेल्या आकृतीबंधाबाहेरील १८ अस्थायी पदांना दि.०१/०३/२०१७ ते दि.३०/०९/२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०/०२/२०१७ प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार विभागीय आयुक्त, कोकण यांच्या आस्थापनेवरील कोकण भवन प्रशासकीय इमारतीच्या साफसफाईसाठी मंजूर असलेल्या सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार आकृतीबंधाबाहेरील १८ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०१७ ते दिनांक ३० सप्टेंबर, २०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर प्रस्तावातील अस्थायी पदांवर कार्यरत कर्मचा-यांच्या वेतनावर होणारा खर्च सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०१७ - २०१८ च्या मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०/०२/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०४१५१५१४१६१८१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sambhaji C Mondkar

Digitally signed by Sambhaji C Mondkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=498986dde0d282daba86b0acfc9c21d4f9594cc3a6d64857d6a53c9b86d5509b, cn=Sambhaji C Mondkar
Date: 2017.04.15 15:21:19 +05'30'

**( सं. चं. मोंडकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२) प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) -१, महाराष्ट्र, मुंबई.
३) अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
४) उप सचिव, कार्यासन आ.पु.क./व्यय-९, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
५) सह सचिव, कार्यसन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

# विवरणपत्र

**(शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: ईएसटी-२०१७/प्र.क्र. ३२/ई-८, दि. १५/०४/२०१७ सोबत)**

| कार्यालयाचे नाव | पदनाम | | एकूण अस्थायी पदे | मागील मुदतवाढीचा आदेश क्रमांक व दिनांक | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई | १ | पहारेकरी | १ | शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ईएसटी-२०१६/प्र.क्र. ७९/ई-८, दि.१८/१०/२०१६ | मागणी क्र. सी-१ २०५३-जिल्हा प्रशासन १०१ आयुक्त (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ००३८७) ०१- वेतन |
| | २ | स्वच्छता निरीक्षक | १ | | |
| | ३ | हमाल | ११ | | |
| | ४ | सफाईगार | ३ | | |
| | ५ | उदवाहक | २ | | |
| | | **एकूण** | **१८** | | |